शेतकऱ्यांच्या दारात भेट देण्यासाठी वैद्यकीय किंवा शल्यचिकित्सा विषयक प्रकरण हाताळण्यासाठी पशुवैद्यकांच्या भेटीच्या दरात सुधारणा करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक- व्हीएचडी-२०२२ /प्र.क्र. ४/पदुम-४
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक ,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०००३२
दिनांक :- २३ मे, २०२२

वाचा :- १) कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय क्र. एलव्हीएस-२०१८/प्र.क्र.१२८/पदुम-४, दि.२६.११.२०१८
२) आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र.डीडीडी / प्र.क्र. ८७/ ६७२८ /२०२१, पसं-१२, पुणे, दि.२३.११.२०२१.
३) अतिरिक्त आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र. डीडीडी/तांत्रिक-२/८७/७३/२०२१, पसं-१२, पुणे, दि.०४.०१.२०२२.

प्रस्तावना-:

शासकीय सेवेतील पशुवैद्यक शेतकरी/गोपालकांना कार्यालयीन वेळेपूर्वी, मध्यांतराच्या सुट्टीत, कार्यालयीन वेळेनंतर, रात्री बेरात्री तसेच, साप्ताहिक आणि सार्वजनिक सुट्टीच्या दिवशी शेतकरी/गोपालक यांच्या विनंतीवरुन त्यांचे दरात स्वत:च्या वाहनाने तात्काळ जाऊन आवश्यक त्या पशुवैद्यकीय सेवा उपलब्ध करुन देतात.

वाचा क्र.१ येथील शासन निर्णयान्वये शेतकऱ्यांच्या दारात भेट देण्यासाठी वैद्यकीय किंवा शल्यचिकित्सा विषयक प्रकरण हाताळण्यासाठी पशुवैद्यकांच्या भेटीचे दर निश्चित करण्यात आलेले आहेत.

सन २०२० पासून इंधनाचे (पेट्रोल / डिझेल) वाढलेले दर आणि सद्यस्थितीतील बाजार मुल्यांचा विचार करता, या विभागाचा शासन निर्णय दि. २६.११.२०१८ अन्वये निश्चित केलेल्या पशुवैद्यकांच्या भेटीच्या दरांमध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

शासन निर्णयः-

कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय दि. २६.११.२०१८ अन्वये शेतकऱ्यांच्या दारात भेट देण्यासाठी वैद्यकीय किंवा शल्यचिकित्सा विषयक प्रकरण हाताळण्यासाठी पशुवैद्यकांच्या भेटीच्या दरांमध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यास या व्दारे शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ. क्र. | पशुवैद्यकीय सेवेचा तपशिल | शासन निर्णय दि. २६.११.२०१८ अन्वये निश्चित केलेले दर (रुपये) | सुधारित दर (रुपये) |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | औषधोपचार किंवा शल्यचिकित्सासाठी कार्यक्षेत्रांतर्गत नगरपालिका / ग्रामपंचायत हद्दीमध्ये भेटीचे दर | ७५/- | १५०/- |
| २. | औषधोपचार किंवा शल्यचिकित्सासाठी कार्यक्षेत्राबाहेर नगरपालिका / ग्रामपंचायत हद्दीबाहेर भेटीचे दर | १५०/- | २५०/- |
| ३. | रात्रीच्या वेळी सेवा द्यावयाची झाल्यास | अतिरिक्त ७५/- | अतिरिक्त १००/- |
| ४. | जनन प्रक्रियेत बाधा आल्यास (डीस्टोकिया) | अतिरिक्त ७५/- | अतिरिक्त १००/- |
| ५. | आरोग्य दाखले देण्यासाठी<br>अ) गाई-म्हशी<br>आ) घोडे | <br>१००/-<br>१५०/- | <br>१५०/-<br>२००/- |
| ६. | रासायनिक पृथ:करण न करता शवविच्छेदन दाखला देण्यासाठी<br>अ) मोठी जनावरे<br>आ) छोटी जनावरे | <br>१००/-<br>७५/- | <br>१५०/-<br>१००/- |

उपरोक्त प्रस्तावित दरांमध्ये शेतकरी / गोपालकांच्या पशुधनास विविध पशुवैद्यकीय सेवा देण्यासाठी शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या सेवाशुल्काचा अंतर्भाव नसल्याने शासनाने विहित केलेल्या / करण्यात येणाऱ्या दराने सेवाशुल्काची आकारणी करण्यात येवून सदर रकमेचा भरणा शासनास करण्यात यावा.

शेतकऱ्यांच्या दारात भेट देण्यासाठी वैद्यकीय किंवा शल्यचिकित्सा विषयक प्रकरण हाताळताना पशुवैद्यकांना शेतकऱ्यांच्या घरी / क्षेत्रावर जाण्या-येण्यासाठीचा खर्च सुधारित दरांमध्ये समाविष्ट असल्याने तो वेगळा आकारावयाचा नाही. औषधोपचार किंवा शल्यचिकित्सेसाठी आवश्यक ती सर्व औषधी, उपकरणे, साधनसामुग्री इत्यादी पशुपालकाने उपलब्ध करुन द्यावीत.

उपरोक्त प्रमाणे सुधारित दर फक्त शासन सेवेत कार्यरत असलेल्या पशुवैद्यकानाच सदर शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून लागू राहतील.

आयुक्त पशुसवर्धन, पपुणे यांनी दर पाच वर्षांनी उपरोक्त प्रमाणे मान्य केलेल्या सुधारित दरांचा आढावा घेवून आवश्यकता वाटल्यास त्यात सुधारणा करणेस्तव आवश्यक तो प्रस्ताव योग्य त्या समर्थनासह शासनास सादर करावा.

सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने तसेच त्या विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.२६३ / २०२१, दि.२२.०४.२०२२ अन्वये व त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेताक २०२२०५२३१४४५००२८०१ आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशाने व नावाने,**

DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE

Digitally signed by DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=690002a7555559bb015f315b03adb3305c59fe381e4dcda1439d119129672733, pseudonym=B6831977DAFE9C462B1F5207DB8DC23334F34E62, serialNumber=5DBCE7AE3AC30F0E55C90CD14E851251037DC61F3291C80EA8638C44D41143AA, cn=DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE
Date: 2022.05.23 14:59:34 +05'30'

**( डॉ. संजय वि डोईजोडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई .
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री (पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे.
६. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, जुने वळू संगोपन केंद्र, बडा हनूमान मंदिराजवळ, सिव्हिल लाईन्स, तेलंगखेडी, नागपूर.
८. पशुसंवर्धन सहआयुक्त, रोग अन्वेषण विभाग, औंध, पुणे.
९. पशुसंवर्धन सहआयुक्त, पशुजैव पदार्थ निर्मिती संस्था, औंध, पुणे.
१०. सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन.
११. पशुसंवर्धन उपायुक्त, गुण नियंत्रण प्रयोगशाळा, गोरेगाव, मुंबई.
१२. विभागीय व्यवस्थापक, गोठीत रेत प्रयोगशाळा, पुणे, नागपूर व औरंगाबाद (हर्सुल).
१३. सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त,
१४. सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद
१५. सर्व सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, जिल्हा पशुवैद्यकीय सर्वचिकित्सालय.
१६. सर्व सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, तालुका लघु पशुवैद्यकीय सर्वचिकित्सालय.
१७. अवर सचिव (पदुम -३), कक्ष अधिकारी (पदुम १, २ व १६) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. निवड नस्ती (पदुम-४).